


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६/ फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ६. फेब्रुवारी १८८३. अंक २.

हें मासिक पुस्तक
पुणें येथें
ज्ञानप्रकाश छापखान्यांत
छापिलें.

किंमत ८ आणे.



अनुक्रमणिका

# विक्रीस तयार.

खालीं लिहिलेलीं उपयुक्त व मनोरंजक पुस्कें हीं आमच्या आफिसांत विक्रीस ठेविलीं आहेत. खालीं नमुद केल्याप्रमाणें पैसा पाठविला असतां लिहून आलेल्या पत्यावर रवाना करण्यांत येतील.

काव्येतिहास संग्रहाचे व्यवस्थापक.

| पुस्तकें | किंमत रु० | टपाल खर्च. |
|---|---|---|
| १ पेशव्यांची बखर | १८१२ | ८२ |
| २ भाऊ साहेबांची बखर | १८८ | ८२ |
| ३ मुक्तेश्वरकृत वनपर्व | २ | ८२॥ |
| ४ वामनी प्रकरणें ४५ | २ | ८२॥ |
| ५ विठ्ठलकृत बिल्हण चरित्र [सुटे कागद.] | ८२ | ८॥ |
| ६ शिवछत्रपतीचें चरित्र | १ | ८१॥ |
| ७ साष्टीची बखर [सुटे कागद] | ८४ | ८॥ |
| ८ ब्रह्मेंद्रस्वामीचें चरित्र [किता] | ८५ | ८१ |
| ९ विठ्ठलराव विंचुरकर यांची कारकीर्द [ ,, ] | ८२ | ८॥ |
| १० राजव्यवहारकोश | ८७ | ८१ |

---

## पोंच.

### सन १८७९ ते १८८२ पैकीं.

| | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| श्रो० य० बा० दीक्षित. ... | २ | १ | ६ |
| रा० ब० मा० वा० बर्वे. ...... | ४ | ६ | ० |
| रा० सा० का० त्रिं० तेलंग. ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, वि० मो० महाजनी. | ४ | ६ | ० |
| ,, ,, सि० खं० दिवाण. ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, कृ० त्रिं० माजोम.... | ८ | १२ | ० |
| ,, ,, रा० ब० फौजदार. ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, र० सि० इंदूर ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, वि० के० कुंटे. ... | ४ | ६ | ० |
| रा० रा० ना० वा० वैद्य. ... | ८ | १२ | ० |
| ,, ,, का० मो० भागवत. ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, वा० वि० जोशी. ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, ल० ग० गंधे. ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, गो० ग० निधोजकर. | ४ | ६ | ० |
| रा० रा० रा० वि० ताटके.... | ४ | ६ | ० |
| ,, ,, दे० पि० वकील ... | ८ | १२ | ० |
| ,, ,, शं० वि० पुराणिक.... | ४ | ६ | ० |
| ,, ,, पां० गो० शास्त्री. ... | २ | १४ | ० |
| ,, ,, मा० रा० नाडकर्णी. | ४ | ६ | ० |
| ,, ,, का० रण० कीर्तिकर. | ४ | ६ | ० |
| ,, ,, वि० रा० पुराणिक ... | ४ | ६ | ० |
| ,, ,, ना० न० फडणीस.... | ४ | ६ | ० |
| ,, ,, त्रिं० बा० गौतम. ... | ८ | ० | ० |
| ,, ,, से० ने० ला० नगर. | ४ | ६ | ० |
| ,, ,, से० ने० ला० विटें. | ४ | ६ | ० |
| ,, ,, प्र० रा० तिवारी ... | २ | ६ | ० |
| ,, ,, से० नें० ज० ला० पंढरपूर ... ... ... | ४ | ६ | ० |

# सूचना.

आम्हीं श्रीरामदासकृत रामायणापैकीं युद्धकांड छापण्यास बरेच दिवस आरंभ केला आहे. दुसरीं तीन कांडेंही आम्हांस मिळालीं आहेत. तर यांच्या आणखी प्रती कोणापाशीं असल्यास त्या आमच्याकडे पाठविण्याची कृपा करावी म्हणजे शुद्ध करण्याच्या कामास मदत होईल. काम झालें म्हणजे ज्यांच्या त्यांस परत केल्या जातील.

**का० सं० व्यवस्थापक.**

---

## विषयक्रम.

**बखरी.**



**मराठी कविता.**



**संस्कृत काव्यें.**

किल्याचे अधिकारी यांजशीं राजकारण राखिलें होतें. व महाराजांची आज्ञा होती. आणखी खर्चास व बक्षिसें देऊन चार दिवस अंताजी शिवदेव व लोक राणी साहेबांकडील वरते राहिले ते उतरोन दिल्हे. यावरून राणी साहेबांनीं संभाजी राजे यांस फौजसुद्धां यावें म्हणून लिहून आणविलें. यावरून महाराजांनीं बापूजी खंडेराव यांस दुसरे वेष देऊन त्यांजकडील कारभारी यांणीं व जीजाबाई साहेबांनीं या खटलियांत आपण पडून शेवटास जावयाचें नाहीं. [ असें ] राजे यांस सांगितल्यावरून पुढें न येतां माघारे जावें ऐसें जालें. महाराजांचे शरीरीं व्यथा बहुत झाली. सर्वांस प्रधानासह बोलावून, "राज्यास धणी पुत्र करून, सर्वांनीं आज्ञेत चालून राज्य देवब्राह्मणांचें हें एक विचारें रक्षावें," आज्ञा केली. आणि शके १६७१ शुक्लनाम संवत्सरे सन खमसेन मया व अलफ मार्गशीर्ष वद्य तृतीया शुक्रवारीं देह ठेवून कैलासवास केला. तों पर्यंत राज्याभिषेक ७६ गुदरले.

याप्रमाणें शाहू महाराज यांणीं बेचाळीस वर्षें राज्याभिषेक यवनाचे नजरबंदींतून येऊन अप्रतिहत आज्ञा पृथ्वीचे ठायीं ऐसें करून परम पुण्यश्लोक होत्साते कैलासवास केला. तो समय परम दारुण! सर्व प्रजा व लोक अष्टप्रधान आदि करून यांस प्रळयच गुजरला! प्रधानपंत व गोविंदराव कारभारी व सरदार यांणीं शहरची नाकेबंदी करून, वाड्या भोंवत्या चौक्या व कारखाने यांस चौक्या पहारे याप्रमाणें करून, प्रधानपंत वगैरे गोविंदराव यांचे वाडियांत येऊन बसले. आणि राणीसाहेब यांचे तीर्थरूप कुवारजी शिर्के यांस बोलावून नेलें आणि सांगितलें जे, "बाईसाहेबांची मर्जी कशी आहे? महाराजांसारखें रत्न गेलें. पुढें राज्यभार चालणें त्यास आम्हांस सर्वांस घेऊन महाराजांची आज्ञा जाली आहे त्याप्रमाणें राज्याचे अधिकारी करून करावयाचें आहे. आम्ही सर्व आज्ञांकित, महाराज तेच बाईसाहेब आहेत. किंवा सहगमन करण्याचा संकल्प आहे. हें विचारून यावें" म्हणून पाठविलें. आणि "आपणापाशीं बखेडा करणार कारभारी यांचा बंदोबस्त महाराजांचे आज्ञेनें करितों" म्हणून सांगून पाठविलें. आणि दादोबा प्रतिनिधी आणि यमाजीपंत व त्यांचे लोक या भोंवते आपले लोक पाठवून नजरबंदी करविली. शिर्के यांणीं बाईसाहेबांस निरोप सांगितला. तेव्हां बाईसाहेबीं विचार केला जे, "सर्व प्रकारें बलवान् प्रधानपंत व गोविंदराव व सर्व कारभारी होऊन ताराबाईचे नातु राज्यावर बसवणें हें राजकारण सिद्ध जालें. तेच पुत्र घेऊन आपण रहावें तरि त्यांचे आज्ञेत चालून ताराबाईचे आज्ञेत चालावें यांत शोभा रहावयाची नाहीं. आपण दादोबा व यमाजीपंत यांचे नादीं लागून

१७. ग्रांड डफ "भाऊ" असें म्हणतात.



अनुक्रमणिका

प्रधान, चिटणीस व कारभारी सर्व तोडिले आणि मलसतही प्रतिनिधीनें शेवटास नेली नाहीं. याउपरि रहाणें व्यर्थ आहे." म्हणोन सहगमन करण्याचा निश्चय केला. "जाली ती गोष्ट बरीच जहाली. महाराज गेले, आम्हांस रहावयाचें नाहीं. तुम्ही सर्व महाराजांची आज्ञा जाली असेल तसें करून राज्य राखावें," बोललीं. पदर टाकिला. आणि साहित्य लौकर करावें म्हणून आज्ञा पाठविली. याप्रमाणें निरोप येतांच तात्काळ प्रतिनिधी व यमाजीपंत यांस आणावयास पाठविलें. यमाजीपंत कुळंबिणीचे घरांत गुप्तरूपें राहिले ते आणून बेड्या घालून कैद केले. आणि पुरंदर व कावनई किल्यावर रवाना केले.

या नंतरि सर्व कारभारी व प्रधानपंत व प्रजा यांणीं दोन पालख्या तयार करून वाडयांत गेले. सर्व कारखान्यास कुलपें घालून चौकी पहारे बंदोबस्त केला. आणि उभयतां पालखींत सर्व राजोपचार वस्त्रें, जवाहीर, अलंकार करून समारंभे गेले. तेथील विधि यथाशास्त्र करणें तो केला. यानंतर उत्तर कार्य मालोजी भोंसले मुंगेकर यांजपासोन चालतें केलें. लक्षावधि रुपये दानधर्म, यथाविधि दानें, ब्राम्हणांस देकार व भोजनें करविलीं. पानगांवांस आधीं बंदोबस्त केला होता. सर्व कारखाने व शागिर्द पेशा हत्ती, घोडे, जवाहीर पोषाक व खजीना देऊन बापूजी खंडेराव चिटणीस व बरोबर चिंतो त्रिंबक तारामाई साहेबांकडील देऊन महाराज राजाराम साहेबांस आणावयासि गेले. बराबर प्रधानपंत यांजकडील लिंबाजी अनंत म्हणोन सरदार फौजसुद्धां दिल्हे. ते पानगांवीं जाऊन मार्गशीर्ष अखेर निघोन येतां मार्गीं दर्याबाई निंबाळकरीण फौजसुद्धां बराबर घेतली. आईसाहेब खालीं राहून राजे आले त्यांची भेट बहुत दिवसांची म्हणून श्रीकृष्णातीरीं शकुन्तेश्वर याचे देवालयीं घेतली. सर्व लोक सामोरे जाऊन भेटले. शहरांत जाणें ते सुमुहूर्तानें जावें म्हणून बहुथ आरळें नजीक मुक्काम करून राजे राहिले. तेथें सर्व सरदार लोक प्रजा यांच्या भेटी होऊन म्हसवे मुक्कामीं आले. याप्रमाणें शाहू महाराजांचें अवतारचारित्र समाप्त झालें. शिवाजी राजे यांचे अंशाच निर्माण होऊन राज्य केलें. तें चरित्र समाप्त जालें. श्री शाहू महाराज छत्रपति व सकवार बाईस दहन श्री कृष्णावेण्या संगमीं प्रवाहांत जालें. त्या स्थळीं महाराजांचें लिंग पाषणाचें व बाई साहेबांची मूर्ती यांची स्थापना केली. ते उभय प्रवाह कर्त्रीत मोठे मोठे पाषाणादि पदार्थ जातात त्या स्थळीं अचल पाषाणरूपें अद्याप प्रत्यक्ष राहिले.

चरित्र समाप्त.

---

१८. ग्रांड डफ यांणीं जो बाळाजीवर आरोप केला आहे त्यास येथें कांहीं आधार नाहीं.



अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.

१. शके १६६५, सन ११५३. खांसा स्वारी राजदर्शनास जाऊन पुण्यास आली; भाऊ साहेब गडा [ ? ] बेदनूर पर्यंत जाऊन सातारियास आली—कलम.

१. शके १६६६, सन ११५४. खांसा स्वारी छ १८ सवाल कार्तिकमासीं नाशिकास जाऊन कोंकणांत शिरून पुण्यास आले. तौराऊ[३२] साहेबांबराबर भाऊ साहेब होते.— कलम.

१. शके १६६७ सन ११५५. भाऊसाहेब व दादासाहेब व जनोबा बाबा सातान्यास जाऊन राजदर्शन घेऊन पुण्यास आले. महादाजी आबाजी पुरंदरे कारभारी स्वारी भेलसें करून छ १३ रज्जबीं, श्रावणमासांत आले. या सालास श्रीमंतांस माधवराव[३३] साहेब पुत्र झाले— कलम.

१. शके १६६८, सन ११५६. खांसा स्वारी राजदर्शन घ्यावयास गेले. तेथें निरोप घेऊन खांसा व दादासाहेब व जनोबा व विश्वासराव व सौभाग्यवती गोपिकाबाई सुद्धां निघोन छ १० रबिलावलीं पंढरीस जाऊन छ २४ जमादिलावलीं पुण्यास दाखल झाली. भाऊसाहेबांची स्वारी निराळी कारभारी सखारामपंत[३४] बोकील, निसबत पुरंदरे, फौज बरोबर घेऊन कर्नाटकांत जाऊन बाहादूर बिंडा घेऊन बेदनुराकडून वगैरे छ ३ जिल्हेजीं गेले, ते छ २ जमादिलावलीं पुण्यास आले. मातोश्री ताई[३५] काशीयात्रा करून घरास आली. जनोबाबाबा यांचा काळ झाला. कलम.

१. शके १६६९, सन ११५७. खांसा स्वारी व कारभारी छ ८ जिल्हेज मार्गशीर्षमासीं निघोन, फौजेस नालबंदी देऊन, खानदेशांतून बेदरपर्यंत गेले. तों नासिरजंग व कारभारी रामदासपंत ऐसे चालोन आले. लढाई होतां असीउंबरीवर येऊन तह झाला. छ[३६] ९ रबिलावलीं पुण्यास येऊन हिंदुस्थान ममसुदाबाद प्रांतीं जाऊन छावणी केली. कलम.

१. शके १६७० सन ११५८. खांसास्वारी हिंदुस्थान प्रांतीं छावणीस होते

---

३२. तागऊ=ताराबाई. इजला यात्रेस नेलें होतें असें दिसतें.

"स्वारी भेलसें पायगडावरून उज्जनीची खंडणी घेऊन माघारे आले. भाऊ साहेब कोंकणांत किल्ले पहावयास गेले. भग येऊन बयाबाईचें लग्न केलें" असें दुसऱ्या बखरींत आहे. बयाबाई ही चिमाजी आप्पा यांची मुलगी. ही ओंकार यांजकडे दिली.

३३. माधवराव यांचा जन्म सावनूर येथें झाला. बाईसाहेबांची व माधवरावांची ओज व जतन नबाबसाहेब यांणीं नीट ठेविली त्यावरून माधवराव नबाबांस 'मामा' असें म्हणत असत.

३४. हे प्रसिद्ध सखारामपंत बापू. यांचा वाडा सासवडास आहे. यांस हिवरें गांव इनाम होतें.

३५. ताई—ह्या कोण ? बाजीरावाचें कुटुंब काशीताई ?

३६. येथें ९ किंवा ५ हें स्पष्ट कळत नाहीं.



अनुक्रमणिका

तिकडील खंडण्या ममसुद्दाबादेसुद्धां घेऊन, प्रयागस्नान करून, देशीं आले. पस्तीस हजार फौजेस नालबंदी देऊन, महादाजी आबाजी पुरंदरे यांस घरीं ठेवून, फौजेसुद्धां राजदर्शनास गेले. कलम.

१. शके १६७१, सन ११५९. खांसास्वारी फौजेसुद्धां साताऱ्यास असतां महाराजांचे शरीरास अस्वस्थ झालें. तेव्हां अष्टप्रधान व भोंसले वगैरे यांजवळ फौज थोडी, प्रधान यांजवळ फौज भारी पाहून, राज्याची बंदोबस्ती करावयास आज्ञा करून, मार्गशीर्ष शुद्ध नवमीस देह विसर्जन झालें. तेव्हां बाई सती जावयास तयार झाली. त्यांचें साहित्य करून, मिरवत क्षेत्र माहुलीस आणून कृष्णेंत दहन केलें. बाई सती गेली व दोन नाटकशाळा[३७] बराबर गेल्या. तेथें कृष्णेंत जागा बांधली आहे. महाराज ताराऊसाहेब राजाराम यांची स्त्री राजेश्रींनी आ ज बें त ठेविली होती. वाड्यांत तिचा बंदोबस्त करून पानगांवीं ताराऊसाहेब यांची नात दरयाबाई निंबाळकरीण ताराऊसाहेबांचा लेक वेडा शिवाजी [ त्या ] चा लेक राजाराम यांचा भाऊ[३८] होता त्यास ताराऊ साहेब गुप्त खर्चास पाठवीत होती. त्यास निंबाळकरणीनें पानगांवास आणिलें. हें वर्तमान राजेश्रींस कळलें होतें. त्यांनीं खंडेराव न्यायाधीश यांस पाठविलें.

महाराजांचा काळ झाला तेव्हां श्रीमंतीं मातबर माणूस व फौज पाठवून निंबाळकरीण बाई सुद्धां साताऱ्यास आणून समारंभ, अन्नसत्र [ करून ] सिंहासनीं राज्यावर स्थापिलें[३९]. छ ८ सफर पौषमास. अष्टप्रधानांस वस्त्रें झालीं. राजाराम राजे, प्रधान बाळाजी बाजीराव, याप्रमाणें होऊन प्रतिनिधीचे मुतालीक यमाजी शिवदेव यांस कैद करून किल्यास पाठविलें. ताराऊसाहेबांचा व हुजूरदार [ ? ] राजेश्रींकडून यांचा बंदोबस्त करून नाना पुरंदरे तेथें कारभारावर ठेविले. भाऊसाहेब यांजबराबर फौज देऊन सांगोल्याकडे पाठविलें. खांसे पुण्यास येऊन, चिरंजीव विश्वासराव यांस दीक्षित पटवर्धन यांची कन्या वधू करून, मोठा समारंभ झाला. लग्नसिद्धी झाली. अष्टप्रधान वगैरे सर्व लग्नास आले होते. वाड्या भोंवतीं वाडे होते ते पाडून मंडप केले होते. पुण्याची वस्ती वाढूं लागली. रंगभट्ट ढेंकणे वगैरे यांचे वाडे पाडले होते त्यांस दुसरी जागा नेमून दिली. नंतर जयापा[४०] शिंदे यांस कारभारी रामचंद्रबाबा शेणवई

३७. नाटकशाळा=राखा; उपस्त्रिया.

३८. 'यांचा भाऊ होता' ह्या शब्दांचा संबंध व अर्थ दुर्बोध आहे.

३९. रामराजास गादीवर बसविण्याचे कामीं जी खटपट झाली ती 'थोरले शाहू महाराज यांचें चरित्र' पृष्ठ ९८–१०१ यांत वर्णिली आहे.

४०. जयापा हा राणूजीचा मुलगा. ह्यानें मारवाडांत नागोर शहरास वेढा घातला असतां त्यास मारेकऱ्यांनीं मारिलें. भाऊ साहेबांची बखर पृ० १५।१६।१७ पहा.

सरकारांतून नेमून दिले होते त्यांचें व सरदारांचें न बने करितां मल्हारजी होळकर यांचे विचारें दूर केले. आणि उभयतां सरदार हिंदुस्थानांत स्वारीस पाठविले. कलम.

१. शके १६७२ सन ११६०. खांसास्वारी व महादाजी आबाजी पुरंदरे फौजेस नालबंदी देऊन श्रावणमासीं डेऱ्यादाखल होऊन चरोळीचे तळावर गेले. तेथें भाऊसाहेब सांगोल्याकडून आले. रामचंद्रबाबा भाऊसाहेबांस भेटले होते. त्यांस घेऊन श्रीमंतांस भेटविलें. आणि श्रीमंतांजवळ बोलणें घातलें कीं, कारभार आम्हीं करूं. तेव्हां हें बोलणें रामचंद्रबाबाचे संकेतें असें समजलें. तो मजकूर महादाजी आबाजी पुरंदरे यांस कळला. श्रीमंतांचें बोलणें झालें कीं, भाऊसाहेब कारभार करूं म्हणतात. तेव्हां पुरंदरे यांणीं उत्तर केलें कीं, आम्ही चाकर, भाऊसाहेब भाऊ आहेत, त्यांचें न ऐकिल्यास दौलत फौटेल. असें म्हणून निरोप घेऊन पुण्यास आले. भाऊ साहेबांस रामचंद्र बाबांनीं पुढें करून नजर छत्तीस लक्ष रुपये दिले. पुरंदरे यांचे विद्यमानें फौजेस नालबंदी पावून तयार होती. भाऊसाहेब व रामचंद्रबाबा कारभार करूं लागले. तों निजाममुलुक यांचे लेक नासरजंग व सलाबतजंग व निजाम अलीखां व बसालतजंग व मोगल अली फुलचेरीकडे[४२] आले होते. तेथें नासरजंग यांचा काळ जाला, ही खबर आली. त्यावरून भाऊसाहेब कर्नाटकांत जाऊन भागानगरास गेले. तों मागें दमाजी गाईकवाड साताऱ्यास आला. साताऱ्यास रामराजे राज्यावर होते त्यांणीं [व] ताराऊसाहेब यांणीं आपली आज्ञा चालवून दमाजी गाईकवाड बोलाविला. तो वीस हजार फौजेनिशीं आला. पुणें पळों लागलें. पुण्यास मुतालकीवर बाबा फडणीस होते. महादाजीपंत पुरंदरे आपले घरीं असतां उभयतांनीं विचार करून गाईकवाड यास चिठ्ठी पाठविली. तो पुण्यास न येतां साताऱ्यास गेला. नाना पुरंदरे तेथें होते. त्यांशीं व यांशीं लढाई होऊं लागली. ही बातमी भागानगरास जातांच शहरापासून सतरा लक्ष रुपये खंडणी घेऊन तेरावे दिवशीं साताऱ्यास दाखल झाले. गाईकवाड यास धरून कैद केला. साताऱ्याचा बंदोबस्त करून श्रीमंत पुण्यास गाईकवाडास घेऊन येऊन आवजी कवडे यांचे वाड्यांत मुजमदाराचे घरापुढें ठेविला. नंतर पर्वतीचे देवालयास काम लाविलें. व दक्षणेचे ब्राह्मणांस डोंगरासभोंवतीं सोपे बांधून देकारास जागा केली[४३]. कलम.

४१. पेशव्यांची बखर पान ६२ व टीप ८ पहा.

४२. फुलचरी=पांदेचरी.

४३. "खांसास्वारी बरोबर भाऊसाहेब कर्नाटकांत सावनूर पावेतों गेले. पुढें महादोबा बाबा रवाना करून उभयतां पुणियास आले. महादोबा अखेरीस आले. दमाजी गायकवाड सातारियास आले होते." दुसरी बखर.



अनुक्रमणिका

१. शके १६७३ सन ११६१. श्रीमंत स्वारीस निघाले. कारभारी भाऊ साहेब व रामचंद्र बाबा. उमाबाई दाभाडी येऊन भेटली. त्यांचे संस्थानाचा बंदोबस्त केला. निजाममुलकाचा काळ झाला. नासरजंग हिदामुदीखाँ[४४]-नाचे लढाईंत मृत्यु पावला. सलतनत[४५] लुटली गेली सबब दक्षिणेस दुसरा सुभा यावा हें राजकारण शिंदे, होळकर यांस करावयास पूर्वीं लिहिलें होतें [ तें ] त्याणीं करून आणिलें. महादाजी आबाजी कारभारांतून राहिले होते. त्यांस सरदारी देऊन, पुणें देशाचा सुभा त्यांचे पुत्र नीलकंठ महादेव यांचे नांवें करून त्यांस स्वारी बराबर घेऊन गेले. हिंदुस्थानांतून मोठे फौजेनिशीं जयापा शिंदे व मल्हारजी होळकर हे दिल्लीहून पादशहापासून गाजुदीखान फरोजंग [ यांस ] दक्षिणेस सुभेदारी करून घेऊन येतात, ही बातमी आली. तेव्हां नासरजंग यांचे धाकटे भाऊ सलाबतजंग व बसालतजंग व निजाम अल्लीखान व मोगल अल्ली भागानगरीं असतां त्यांस खबर कळली. त्यांणीं दिल्लीस पत्रें पातशहास पाठविलीं आणि श्रीमंतांकडे सरलष्करखान व जानोजी जसवंत निंबाळकर यांस बोलावयास पाठविलें, तों दिल्लीहून पत्र आलें म्हणून वकिलांचे लिहिणें श्रीमंतांस भाद्रपदमासीं आलें कीं, नबाबास पत्रें दिल्लीहून आलीं आहेत. तुमचें काम दक्षिणेचें तुम्हांस बहाल असे म्हणून आश्विन मासीं गाजुदीनखान व मल्हारजी होळकर व जयापा शिंदे फौजेसुद्धां औरंगाबादेस दाखल झाले. मसलतदार सय्यद हुसमतखां व महंमदखान होते. त्यांनीं श्रीमंतांस सांगून पाठविलें कीं, शिंदे व होळकर उभयतां सरदार आपले भेटीस येतील. सय्यद लष्करखान व जानोजी निंबाळकर आले आहेत त्यांस निरोप न देतां बराबर घेऊन शहागडावर यावें. आम्हीही मागाहून येतों. आपले आमचे विचारें ठरेल तसें होईल. त्याजवरून श्रीमंतांनीं कूच करून, खान व निंबाळकर [ यांस ] घेऊन शहागडावर गेले. होळकर व शिंदे येऊन भेटले. मागाहून गाजुदीनखान यावे तों त्यास औरंगाबादेस नबाबाकडे मेजवानी झाली. मृत्यु पावले. श्रीमंतीं सरलष्करखान व जानोजी निंबाळकर यांस निरोप दिला. मल्हारजी होळकर हिंदुस्थानांत गेले. शिंदे देशीं राहिले. सरलष्करखान व निंबाळकर बसालतजंग यांस जाऊन भेटले. नंतर बिघाडीचा अर्थ पेशव्यांच्या दृष्टीस पडला तेव्हां मल्हारजी होळकर यांस पत्रें पाठविलीं. बसालतजंग व दिवाण रामदास पंत व इंग्रेज[४६] जंगी फरासी सामान सुद्धां मोठी फौज घेऊन चालून आले. तेव्हां

४४. हिदामुदी=हिदायत मोयदीनखान—हा निजामुल्मुल्क यांच्या लेंकीचा पुत्र. यास मुजफरजंग असेंही म्हणतात.

४५. सलतनत=जिंदगी, सर्वस्व.

४६. 'इंग्रज' हें चुकीचें आहे. हा फरांसीस मांशर बुस्सी हा होय.

महादाजी आबाजी पुरंदरे माजी [?] असतां कारभारांतून मन काढून होते. सरकारचे फौजेवर ग्रहणाचे पौर्णिमेस छापा घातला. असा उंबरीवर मोंगल आला. पुण्यांत पळण झाली. दुसरे दिवशीं लढाई होतां पाच हजार फौजेनें चालून महादाजी आबाजी पुरंदरे व दत्ताजी शिंदे व महादजी शिंदे बारगीर व कोन्हेर त्रिंबक एकबोटे वगैरे अकरा असामींनीं डोलीची४७ अंबारी खालीं केली. तेव्हां सरकार फौज येऊन अंबारी लुटली. मोगल शिकस्त झाला. जहागीर देऊन सल्ला करून गेला. होळकर यांचीं पत्रें आलीं कीं, रोहिले पठाण कमाऊनचे पहाडांत आहेत. त्यांचें निस्तनाबूद करावें असें होतें, परंतु स्वामी-कडून एक दोन पत्रें आलीं कीं, कळेल तैसा निर्गम करून तुम्हीं येणें. त्याव-रून रोहिले पठाण यांचा व वजिरांचा सलोका करून देऊन कूच करून, भागी-रथी उतरून, दक्षणतीरास आलों; वजीरही एक दोन दिवसांत येतील; मजल दरमजल येत आहोंत; त्यास वजिराकडून व दिल्लीहून बातमी आली कीं, स्वामी-चा व सलाबतजंगाचा सलोक जाला. त्यास सल्ला जाला नसला तरि तसेंच लिहून पाठवावें. मजल दरमजल येत आहोंत. सल्ला झाला असला तरि इक-डेही कामकाजें आहेत, यामध्यें जसें वृत्त असेल तशी आज्ञा केली पाहिजे. मोंगलाचे छाप्यांत बाबूराव फडणीस यांचे पायांस गोळा चाटून गेला. राम-चंद्रबावा कारभारी यांणीं कर्जाची* पट्टी लोकांवर घातली. कलम.

१. शके १६७४ ४८सन ११६२. खांसा स्वारि, कारभारी भाऊ साहेब व रामचंद्रबावा, कर्नाटकांत जाऊन श्रीरंगपट्टण पर्यंत गेले. मार्गीं होळहुनूरचें ठाणें घ्यावयास मोर्चे लाविले. तेथें भाऊ साहेब व रामचंद्रबावा मोर्च्यांत तीन दिवस बसले होते. नंतर कोन्हेर त्रिंबक एकबोटे यांस आज्ञा केली. ते गे-ले. मागाहून श्रीमंतांजवळून कृष्णा पलांडा व रामजी पवार व रूपतराव व बाबाजी पडवळ वगैरे अकरा असामी कोन्हेर पंताजवळ जाऊन किल्यावर चढले. कृष्णाजी गोळी लागून ठार झाला. किल्ला फत्ते झाला. अकरा असामींस बक्षिसें दिलीं. पलांडा मजकूर यास मु ख ई ची [?] पाटिलकी दिली. रघुनाथ बाजीराव यांची स्वारी निराळी करून सखाराम भगवंत कारभारी दिले. त्यांणीं आमदाबादेस जाऊन हिंदुस्थानांत शिंदे होळकर [यांसह] गेले. खांसा स्वारी करनाटकांतून घरास आले. रामचंद्र बाबा कारभारास आहेत. गणपतीच्या

४७. डोलाची अंबारी=झोंपा घेतां येईल अशी ? ही खांसेनबाबाची असावी.

* हें या स्वारीचें कर्ज असावें.

४८. "स्वारी बरोबर भाऊ व दादा ना-सिक पावेतों होते. पुढें खांसा व भाऊ कोंकणांतून पुणियास आले. दादा साहेब गुजराथेंत आमदाबाद घेऊन था (?) ल-नेरीं होळकर सुद्धां मिळोन हिंदुस्थानांत गेले." दुसरी बखर.

मागें लक्ष्मणपंत कोणी गृहस्थ नांदत होते त्यांची जागा घेऊन घर बांधिलें. तेथें तीन वर्षे कारभार करून मृत्यु पावले. त्यांस दत्तपुत्र सदाशिव रामचंद्र झाले. पुरंदरे घरीं होते त्यांस सरदारी सांगितली. त्यांत हरी गोपाळ सुपेकर सरदारीवर होते. सुभ्याचें काम नारो आपाजी करीत होते. विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग वगैरे कोंकणांत, तेथें अम्मल इदलशाई विजापुराकडील प्रथम, नंतर अमात्य बावडेकर, नंतर कान्होजी आंग्रे वर्षे वीस, त्याचा लेंक सखोजी त्यास लेंक संभाजी व मानाजी, त्यास लेंक संभाजी, त्यास तुळाजी, त्यास लेक मानाजी कुलाब्याकडे असत. कलम.

१. शके १६७५ सन ११६३. देशीं स्वारी असतां माधवराव साहेबांचें लग्न शिवाजी बल्लाळ पागेकडे अशी [?] डुंबरीस होते. त्यांची कन्या सौभाग्यवती रमाबाई निश्चय करून लग्न केलें. बाबा व बाबुराव फडणीस व आबा मुजु-मदार व महिपतराव चिटणीस व कृष्णराव पारसनीस व कोन्हेर त्रिंबक एकबोटे यांस पालख्यांचीं वस्त्रें दिलीं. दादा साहेब व कारभारी सखारामपंत हिंदुस्था-नांत छावणीस आहेत. कोंकणांत अम्मल आंग्रे यांचा. महादाजी आबाजी पुरंदरे घरीं. कारभारास भाऊ साहेब आहेत. कलम.

१. शके १६७६ सन ११६४ श्रीमंत देशीं सिंहस्थास गंगातीरास जाऊन आले. महादाजी आबाजी पुरंदरे यांबरोबर सरकारचे कारखाने व फौज देऊन तोफखाना नवा सजवून माधवराव पानसे कुळकर्णी मौजे सोनोरी[५१] तालुके करेपठार यांस कारखाना सांगोन बराबर देऊन कर्नाटकांत पाठविलें. त्यांनीं कर्नाटकांत जाऊन बिदनूरची खंडणी घेऊन, अखेरीस सासवडास आले. कारखाने व निशाणें सरकारांत पाठवून दिलीं. स्वारींतून मुशाफरजंग, गारदि-यांचा सरदार, पळून गेला. दादासाहेब हिंदुस्थान छावणी कुंभेरीकडे. कारभारी सखारामपंत बापू. कोंकणांत आंग्रे यांजवर स्वारी आली. खंडोजी माणकर व रामाजी महादेव व संक्राजी निळकंठ वगैरे जाऊस किल्ले घेऊन अम्मल सरकारी झाला. पर्वतीचे देवळाचें काम तयार झालें. पूजा एका-

---

४९. हे सोलापूरकर जोशी.

५०. "सांसास्वारी व भाऊ माधवराव यांचें लग्न करून कर्नाटकांत गेले. तेर-दळ, जमखिंडी घेऊन माघारे आले. दादा साहेब हिंदुस्थानांत कुंभेरीस गेले." दुसरी बखर. तेरदळ हल्लीं सांगलीकरांकडे आहे.

५१. सोनोरी ता० पुरंदर हा गांव पा-नसे यांस इनाम आहे. जवळच मल्हार-गड नांवाचा किल्ला आहे तो त्यांजकडे होता. हल्लीं सोनोरी येथें पानशांचीं मुख्य तीन घराणीं आहेत. माधवराव हे शिवा-जी माणकेश्वर यांचे चिरंजीव. पानशांच्या घराण्याची संक्षिप्त हकीगत वरील माधवराव पानशे यांचे वंशज केशव बापूराव पानशे यांणीं आह्मांकडे पाठविली आहे याबद्दल आह्मी त्यांचे फार आभारी आहों.



अनुक्रमणिका

दशीस त्यांसे जाऊन करूं लागले. पर्वती संस्थान केलें. चतुर्थीस थेउरास स्वारी जात होती. थेऊर व आळंदी व गणेशखिंड व [?] पाषाण या मार्गी झाडें लाविलीं. पुण्याची वस्ती वसली. शेतें मोडून वसाहत झाली. स्वारी सासवडास जाऊन महादाजी आबाजी पुरंदरे यांस पुण्यास घेऊन[५२] आले. कलम.

१. शके १६७७ सन ११६५. श्रीमंतांस नारायणरावसाहेब पुत्र झाले. दादा साहेब हिंदुस्थानांतून तीन वर्षे छावणी करून आले. कारभारी सखारामपंत असतां कृष्णराव बल्लाळ[५३] काळे व विसाजीपंत लेले व चिंतो विठ्ठल त्यांजवळ आहेत. जानकीबाई दादासाहेबांची स्त्री निवर्तली. दुसरें लग्न कृष्णातिरीं गलगलें येथें स्वारींत झालें. सौभाग्यवती आणंदीबाई[५४] नांव ठेविलें. सलाबतजंग भागानगरींहून चालून आले त्यांशीं सल्ला केला. सावनुरांत मुरारजी घोरपडे हिंदुराव त्यास पेशजी स्वारींतून मुजाफरजंग रुसून गेला होता तो त्यांशीं मिळून सावनूर बळाऊन लढाई लागली. त्यावर श्रीमंत व भोंसले नागपूरकर व नबाब [ अशी ] लाख फौज जमा झाली. मोर्चे लाविले. ते सालीं महादाजी आबाजी व कोन्हेर त्रिंबक घरीं होते त्यांस बोलावून घेतले. मुसा बुशी फिरंगी नबाबाकडील त्यानें तोफांचा मार देऊन गांवकुसूं पाडिलें. हल्ला जाला. कोन्हेर त्रिंबक यांस कपाळास गोळी चाटून गेली. भाऊसाहेब व पुरंदरे मोर्च्यांत होते. मुरारराव घोरपडे कौल घेऊन गुतीस गेले. सल्ला जाला. मुजाफरखान चाकर ठेवून श्रीमंतांनीं बरोबर घेतला. निजामअल्ली भागानगरास गेले. नागपुरास भोंसले निरोप घेऊन गेले. पर्वतीस तळ्याचें काम लाविलें. खासे जाऊन बसत होते[५५]. कलम.

१. शके १६७८[५६] सन ११६६. खांसा स्वारी फौजेनिशीं नालबंदी देऊन साठ हजार फौज घेऊन कारभारी भाऊसाहेब [ असे ] कृष्णातीरास गेले. करनाटक प्रांतींचे वकील आले. खंडण्याचा करार करून घेऊन तोफखाना

---

५१. नित्य आळंदीस जाणाऱ्या एका गौळी जातीच्या वारकऱ्यानें झाडें लाविलीं असें सांगतात तें ह्या वरून खोटें ठरतें.

५२. "खांसा स्वारी कृष्णेपर्यंत जाऊन माघारी आली. नंतर सिंहस्थाकरितां नासिकास गेले. दादा साहेब हिंदुस्थानांत." दुसरी बखर.

५३. कृष्णराव हे निजामाकडील पेशव्यांचा प्रसिद्ध वकील जो गोविंदराव काळे त्याचे तीर्थरूप.

५४. ही ओक यांची कन्या.

५५. "कुंभेरीहून दादा देशीं आले. जानकीबाई प्रसूत होऊन मरण पावली. उपरांत गलगल्यास लग्न करून सावनुरास स्वारीस (खांसाकडे) गेले. याच सालीं तुळाजी आंग्रे धरून आणिले." दुसरी बखर.

५६. "सु० स० सब्बा खमसैन (मयाव अल्लफ् ११५७ इ० स० १७५६) खांसा स्वारी श्रीरंगपट्टणास गेली. बरोबर भाऊ. दादासाहेब कितुरास." दुसरी बखर.



अनुक्रमणिका

जंगी सौंमानें बरोबर असतां श्रीरंगपट्टणास गेले. तेथें कुंभार राजा. त्याजवळ हैदर नाईक जमादार होता. मोर्चे देऊन सत्तावीस दिवस लढाई केली. खांसा भाऊ साहेबे मोर्च्यांत होते. मोर्च्यांतील तोफ एक फुटली त्यानें माणसें जायां झालीं. नंतर सल्याचें बोलणें होऊन, छत्तीस लाख रुपयांचे होन व पंधरा लक्षांची हुंडी, एकूण एकावन लक्ष रुपये खंडणी घेऊन श्रीमंत ज्येष्ठमासीं तुंगभद्रेवर आले. नदीस पाणी फार होतें. श्रीमंतांनीं पूजा करून प्रार्थना केली. उतार होऊन लष्कर उतरून आलें. पुढें कृष्णेवरही याप्रमाणें झालें. लष्कर उतरून पार आलें. श्रीमंत आलीकडे आल्यावर कृष्णेस पाणी पूर्ववत् प्रमाणें जाहलें! दर कूच निघोन सत्ताविसावे दिवशीं पुण्यास दाखल जाहले. दादासाहेब यांस कारभारी सखाराम भगवंत हे व होळकर समागमें स्वारी हिंदुस्थानांत पाठविली. कलम.

१. शके १६७९ सन ११६७. स्वारी श्रीमंत विश्वासराव, कारभारी बाबूराव फडणीस, सरदार दत्ताजी शिंदे, फौज सुद्धां व हुजरात पागा व सरदार निजाम अल्लीखां याजवर रवाना केले. त्यांजकडील वकील पांच लक्ष रुपयांची जहागीर देतों म्हणोन बोलण्यास आले. तें श्रीमंतांनीं न ऐकतां बिघाड दाखविला. नबाब चालून आले. बरोबर विठ्ठल सुंदर दिवाण होते. निजाम अल्लीखां येतात हें ऐकून भाऊसाहेब फौजे सुद्धां डेरां दाखल होऊन मागाहून चालले. हुजुरात पंचवीस तीस हजार घेऊन कूच दर कूच नाशकास जाऊन, गंगास्नान करून, नगर किल्यानजवळ फरा [ ? ] बागांत मुक्काम केला. विश्वासराव यांची व नबाब बहादुर यांची लढाई होऊं लागली. दत्ताजी शिंदे यांनीं तरवार फार केली. नबाब शिकस्त होऊन पंचवीस लक्ष रुपयांची जहागीर व किल्ले देऊन सल्ला केला. उभयतां श्रीमंतांच्या भेटी झाल्या. या पूर्वीं नबाबाची भेट विश्वासराव यांनीं भगवंतराव कडेकर [ ? ] याचे विद्यमानें घेतली होती. नबाब निघोन गेले. उभयतां श्रीमंत पुण्यास आले. हिंदुस्थानांत दादासाहेब छावणी करून राहिले. कारभारी सखारामपंत व जनार्दन बल्लाळ फडणीस होते. त्यांत फडणिसांचा काळ झाला. कलम.

---

५७. जंगीसामान=लढाऊ सामान, दारू गोळा वगैरे.

५८. यावरून व मागील पुढील मजकुरावरून भाऊंस लढाईचा सराव नव्हता असें बिलकुल होत नाहीं.

५९. " सु० स० संमान खमसैन (म० अ० ११५८ इ० स० १७५७) खांसास्वारी बराबर भाऊ तांदुळजे पर्यंत गेले. नबाब निजामअल्लीखां याजपासून २५ लक्षांची जहागीर घेतली. दादासाहेब कितुरास." दुसरी बखर.

६०. भाऊ साहेबांची बखर पृ० ३६ व ३७ पहा.

[ ४१ ] ॥ श्री लक्ष्मीकांत ॥

हुकूमनामा सरकार श्रीमंत महाराज राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा बे॥ शिवराव पांडुरंग सु॥ सीत अर्बेन मयातैन आलफ. छावणी फौज सोनेगांव येथें फौजेंत तुमचे कडील कारकून दाखल्याचे कामीं आहेत त्यांस सांप्रत ज्याप्रमाणें छावणी फौज माहाराजगंज येथें शिरस्ता चालत आला त्याप्रमाणेंच याही फौजेंत राहील हें समजोन हा हुकूमनामा तुम्हांस सादर केला असे. त्यास तुम्ही छावणी फौज सोनेगांव येथून आपले कारकून दाखल्याचे कामीं आहेत त्यांजला मेदसरसुद्धां बोलावून घेणें. जाणिजे छ० १ माहे शवाल सन १२५५ साल फसली मोर्तब सुद .

[ ४२ ] ॥ श्री लक्ष्मीकांत ॥

राजश्री बाळाजी रामचंद्र गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य— श्रे॥ रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा दंडवत सु॥ सन इसने अशर मयातैन व अलफ राजश्री अमृतराव पांडुरंग यांनीं विनंतीपत्र पाठविलें त्याजवरून सरकारचे समजण्यांत आलें [ कीं ] पेंढारी यांचा जमाव येकायेकीं कोणास बातमी न समजतां नागपूर शहरचे जवळ येवून मंगळवारी पेठेस आग दिल्ही. आणि चहूंकडून येकच बेलवा केला. त्या प्रसंगीं तुम्हीं जातीनीं जाऊन तोफखाना व बाणांच्या कैच्या रवाना केल्या होत्या त्या माघाऱ्या आणोन, तोफखान्याचा गोलंदाज वगैरे एकत्र करून पेंढारी यांची लढाई घेऊन त्या लोकांचें पारपत्य करून शहर वाचविलें व त्यांचे मागें धावून जाऊन जागजागीं ज्या ज्या रुखावर त्यांचा शह त्या त्या रुखावर तोफेचा आणि बाणांचा मार करून परागंदा केलें. इत्यादिक मजकूर सरकारचे समजण्यांत आले. यास तुम्ही तीर्थस्वरूप कैलासवासी आबासाहेब यांचे वेळेपासून वडिलोपार्जित सरकार चाकरी ऐसीच निःसीम पणें करीत आलां, व फार दिवस सरकारचे पदरीं अन्न खात आलां व सरकारची सेवा ही करीत आलां तेव्हां तुह्माविषयीं सरकारची खातरजमा आहेच. हल्लीचे वेळेस सरकारची खांसा स्वारी प्रसंगीं नसतां मेहनत केली आणि अमृतराव पांडुरंग यांस गोळी लागून जखमी जाले असतां सर्वत्रांस समेटून राजश्री शिवराव पांडुरंग यांस पुढें करून सरकारचा नक्षा कायम ठेविला याचा संतोष सरकारास फार झाला. त्यास ऐसी चाकरी तुमचे वडिलांपासून होतच आली आहे. त्याप्रमाणें हल्लीं तुम्हीं केली व पुढेंही करीत जाणें. तुह्माकडेस हजेरी गणती वगैरे फौजेची आहे त्याप्रमाणें

१. दगा.
२. बाण दारूचे
३. भवानीपत काळू.

चालेल आणि तुमचे वंशस्थाचा निर्वाह शिलशिल्यानुरूप सरकारांतून होईल, एविशीं तुम्ही आपली खातरजमा ठेवणें. जाणिजे छ ५ माहे रबिलावल. बहुत काय लिहिणें. (शिक्का.)

[ ४३ ]

## नबाबाची व जानोजी भोंसलेची कलमबंदी.

**सवाल १.**---बराड प्रांतीं तह पहिले पासून आहे. त्याप्रमाणें अमल सुरळीत चालावा. त्यांत खलश[1] नसावा. ज्यास्ती उपद्रव करूं नये. कलम.

**ज० १.**---खलेल आम्हांकडून जाहला असला तरि जाबसाल खाम हिशेब मनास आणून करूं. पुढें तहाप्रमाणें चालूं येणेंप्रमाणें.

**स० २.**---सालमजकुरीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांची स्वारी बऱ्हाड प्रांतीं आली. भोंसले यांचा हिस्सा म्हणून महालों महाल ऐवज घेतला. त्याची रसीद एकंदर महालों महालची द्यावी कीं, जो आकार मामलत रूईनें होईल त्यांत सरकार हिस्सा जाऊन बाकी ह्याचा हिस्सा राहील त्यांत तो ऐवज मजुरा द्यावा.

**ज० २.**---ऐवज सालमजकुरीं न पुरतां येत्या सालांत राहिला ऐवज मजुरा देऊं. रसीद बाजवी असावी.

**स० ३.**---देवगड चांदा येथील पेशकशीचा ऐवज सुदामत प्रमाणें देत नाहींत. त्याचा मागील हिशेबाप्रमाणें ऐवज नगद द्यावा. व पुढील सावकारी निशा द्यावी. कलम.

**ज० ३.**---[ ही जागा मूळांत कोरी आहे.]

**स० ४.**---गढिया व ठाणें सांप्रत नवीन घेतले आहेत त्यांत सुदामत[2] ठाणें राहत आहेत ते ठाणें सोडावीं. ठाणें आमचीं. कलम.

**ज० ४.**---तहाखेरीज घेतलीं असतील तरि माघारी घ्यावीं.

**स० ५.**---सांप्रत फौजेचे उपद्रवामुळें वऱ्हाड मुलूख प्रांत खराबीत आले. त्यास कौलपत्र देऊन आकाराचा पैसा घेऊन त्याची उरतवारी करावी; उभयतां कडून कौलास अंतर नसावें. ज्यास्त उपद्रव न करावा.

**ज० ५.**---प्रांत उभयतांचा आहे. त्यास उभयपक्षीं उचित तें करावें.

**स० ६**---वऱ्हाड प्रांतीं सुभा राहील त्यानें व सरकारचे सुभेदारानें आपापले तहाप्रमाणें अम्मल करून सुरळीत वर्तावें; हिशेबाप्रमाणें महालाचा वसूल द्यावा; जहागीरदार वगैरेचे महालास उपद्रव न द्यावा. कलम.

---

१. दुजाभाव. २. पूर्वचालीप्रमाणें.



अनुक्रमणिका

ज० ६—सदर्हू प्रांत तुमचा आमचा आहे त्यास उभयतांनीं परस्परें जें उचित तें करावें. येणेंप्रमाणें.

स० ७—जहागीरदारांचे महालांत तह व गांवखर्च व सरदेशमुखी वजा करून बाकी निंमेनिंमे ऐवज घेत जावा; त्या करारांत अंतर नसावें. कलम.

ज० ७.—[ही जागा मूळांत कोरी आहे]

स० ८.—पागेकरी वगैरे पतकी महालांत राहतात. त्यांनीं बाबगा उपद्रव रयतीस न द्यावा. कलम.

ज० ८.—जें उचित तें उभयतांनीं करावें.

स० ९.—भागानगर व बेदर व अवरंगाबाद वगैरे प्रांतीं घांसदाणा नबाब असफज्याचे वेळेस न होतां, सांप्रत ही खास फौज त्या प्रांतीं असल्यास घेऊं सकत नाहींत. फौज मोर्हामशीर असतां मागें उपद्रव देतात ते न करावा. कलम.

ज० ९.—घांसदाणा नबाब असफ़ज्याचे वेळेस व नासरजंग यांचे इनायत झाला. घांसदाणा मामूल घेणें. येणेंप्रमाणें.

स० १०—प्रगणे नाचणगांव वगैरे महाल वर्धापार आहेत त्यांचा तहाचे वेळेस इजारा करून दिल्हा. त्या तागाईत तो ऐवज न आला तो नगद द्यावा पुढें सावकारी निशा जाली यास महाल त्याजकडेस रहावेत नाहीं तरि सदर्हू महाल सोडावेत.

ज० १०—सदर्हू इजाऱ्याचे तहाप्रमाणें ऐवज बेमुजीब हिशेब भरून तागाईत राजे बहादुर दिल्हा. आलीकडेस सनदा आहेत त्यास कराराप्रमाणें सनदा असल्यास उत्तम.

स० ११—साबाजी भोंसले यांस जागिर बशर्त चाकरी करावी म्हणून दिल्ही. त्यास कराराप्रमाणें फौज चाकरीस नाहीं. सबब फौज चाकरीस द्यावी. अथवा महाल सोडावे.

ज० ११.—चाकरी बशर्त परंतु आज पावेतों चाकरी केली नाहीं. जहागीर आसफज्यापासून आहे.

स० १२—आमनेरचा किल्ला यास दिल्हा. सबब कीं, हे येऊन सरकारांत सामिल जाहले. पुढें सामिल राहून कितीएक मनसुबे करावे, तों याजकडे सामिलातींत अंतर जहालें सबब किल्ला व महाल सोडावा. दिकत नसावी.

ज० १२.—बेमोजिब सनद जवाबसाल आहे.

स० १३.—राजाराम बाबूराव सुभेदार आपले सुभ्यांत अम्मल करितात. त्यास बुडविलें त्याची माल मवेशी व सरकारच्या तोफा वगैरे माघाऱ्या द्याव्या. क० १

ज० १३.—वाजवी.



अनुक्रमणिका

**स० १४.**—निंबाळकर वगैरे त्यांचे महालांत पैसे वगैरे वानवी घेतले ते जमीदारांचे रुजुवातीनें सदहू ऐवज माघारा द्यावा. कलम १.

**ज० १४.**—बत्तिसां लक्षांची जहागिर श्रीमंतानें दिली त्या महालाचा वसूल नवाबचे सरकारांत अगर जहागिरदारांकडे जमीदारांकडे त्या वेळीं सदहू निंबाळकर वगैरे यांचे तालुक्यांत घेतला असेल.

**स० १५.**—हवेली आळजपूर याचा मक्ता सरदेशमुखी मोकाश पावती घांसदाणा वगैरे कुल मुकरार रुपये २५००० पंचवीस हजार अक्षरीं पंचवीस हजार घेत जावे. याचप्रमाणें तहनामा आहे त्यास सांप्रत कराराशिवाय ऐवज अधिक घेतला असेल तो ऐवज माघारा दरोबस्त दिला पाहिजे. कलम १.

**ज० १५.**—[ही जागा मूळांत कोरी आहे]

[४४] **भोंसल्यांच्या लढाया आणि *तहनामे.**

[१] पहिला रघोजी

तारीख चंद्र १२ माहे जून सन १८२१ इसवी साहेब अल्लीशान बहादूर [रेसिडन्ट साहेब] यांनीं हुकूम केला जे, ज्या लढाया जाहाल्या त्याच्या नंतर बोलाचाली काय जहाली व गोष्ट मात काय जाहाली ते कळवावी.

मोठे रघोजी भोंसले यांचे वेळेस पांच लढाया जाहाल्या एक [१] कान्होजी भोंसल्याची [२] दुसरी बंगाल्याची [३] तिसरी देवगडची [४] चवथी चांद्याची [५] पांचवी निजामअल्लीखांची. या पांच लढाया जाहाल्या यांशिवाय भोपाळाकडेस पेशवे साहेबांबरोबर गेले होते व बुंदेलखंडाकडे व त्रिचनापल्लीकडे व चंदीचंदावराकडेस गेले होते. जाण्याचें कारण मुलूख लुटावा आणि खंडण्या घ्याव्या, इतकें कारण; सवालजबाब नाहीं; याचा तपशील या प्रकारें:—

१. प्रथम रघोजी भोंसले साहेबांस सेनासाहेबीची पदवी मिळून कान्होजी भोंसलेचे कामावर स्थापित जाहाले. कान्होजी चुलत चुलता याशीं व रघोजीशीं लढाई उमरावती व बाळापूर यांचेमध्यें जाहाली. तेव्हां कान्होजीचें बोलणें राजा शाहूशीं काय जहालें हें न समजलें. परंतु कान्होजी भोंसल्याची सैलतनत बिघडल्या नंतर त्याचे पुत्राशीं व रघोजीशीं करार मदार जाहाला त्याचा बजिन्नस तहनाम्याचा आहे. नक्कल सन ११४९ जे

* प्रस्तुत लेख बराच मोठा आहे व त्यांत कोठें युद्धसंग्रामाची हकीकत सविस्तर दिली आहे. या समग्र लेखाची दुसरी प्रत आमच्या पाशीं नाहीं तथापि इतर ठिकाणीं यांतील कित्येक गोष्टींचा उल्लेख आला आहे व तहनाम्यांच्या सबंध प्रती मिळाल्या आहेत ह्मणून हा लेख जितका सुबोध करवला तितका केला आहे.

१. पहिला रघोजी.

२. सलतनत–सलतान–सलतन = फौजफाटा, घोडेस्वार.

निघाले बळें भार साही जणांचे । महावीर ते गर्जती विक्रमाचे ॥
रणामंडळीं पारखे वीर कैसे । दळेंशीं बळें धांवती काळ जैसे ॥ ४८ ॥
महा मार दोहीं दळीं एक जाला । कपी वीर राक्षेस कीती निमाला ॥
पुढें वानरीं घोर घातें निघातें । रणीं भग्न केलें तयां राक्षसांतें ॥ ४९ ॥
तयां देखतां लोटला दिव्य घोडा । नरां-अंतकू कोपला वीर गाढा ॥
बळें हाणतां शस्त्र वाजे घडाडां । तुटों लागले पादपाणी थडाडां ॥ ५० ॥
बहू वेग संहारिती सर्व सेना । कपी पाहती अश्व कोठें दिसेना ॥
पुढें पाहतां पाहतां लाग वेगीं । अकस्मात तें आदळे खड्ग अंगीं ॥ ५१ ॥
बहूसाल तेणें [v]तया वानरांच्या । ग्रिवा कापिल्या थोर माहा विरांच्या ॥
कपी-वाहिनीचा रणीं आट जाला । [w]भुमी लोटिले शोणितें पूर आला ॥ ५२ ॥
कपी वीर ते खोंचले भग्न जाले । महा मार देखोनि वेगें[x] पळाले ॥
कितीएक ते सुग्रिवा आड गेले । पुढें अंगदें सर्व ही स्वस्थ केले ॥ ५३ ॥
उणें देखिलें धांवला शीघ्र कोपें । बळें ताडिला अश्व तो वज्र-थापें ॥
नरा-अंतकाला रणीं अंत आला । बहू मेद-मांसें भुमी गाळ जाला ॥ ५४ ॥
नरा-अंतका मारिलें अंगदानें । पुढें वीर ऊठावले घोर-त्राणें ॥
रणामंडळा माजि ते शीघ्र आले । तया अंगदा ही कपी साह्य जाले ॥ ५५ ॥
करी नीळ तो युद्ध माहोदराशीं । महा वीर देवांतकू मारुताशीं ॥
भिडे त्रीशिरा पार्श्व तो ऋषभेशीं । बळें झुंझती चौघे तीघां जणांशीं ॥ ५६ ॥
पुढें मांडिला थोर संहार तेथें । रणीं माजलीं तैं बहूसाल प्रेतें ॥
महावीर ते धीर संग्राम-सैरें । बळें धांवती एकमेकां पुढारें ॥ ५७ ॥
विरश्री बळें दूर टाकूनि शंका । रणीं हाणती घाय ते येकमेकां ॥
महा थोर संग्राम साही जणांचा । पुरीं पूरला अंत त्या राक्षसांचा ॥ ५८ ॥
गजारूढ माहोदरू त्या निळानें । रणामाजि देवांतकू मारुतीनें ॥
महा वीर पारश्व त्या ऋषभानें । रणीं झुंजतां पाडिले थोर मानें ॥ ५९ ॥
बळें कोपला तो अती चंडकाया । रथू लोटिला शत्रु तेणें जिताया ॥
कपी वीर ते आडवे शीघ्र आले । पुढें चालतां सर्व ही भग्न केले ॥ ६० ॥
रथीं बैसला पर्वता सारखा तो । म्हणे राम हा कोण युद्धासि येतो ॥
वदे शीघ्र बीभीषणू रम्य वाचा । रघूनायका पुत्र हा रावणाचा ॥ ६१ ॥
सखा होय सौमित्र तुह्मांसि जैसा । अतीकाय तो मेघनादासि तैसा ॥
न लेखी कपी-वाहिनीचा उठावा । तुह्मीं कीं सुमित्रा-सुतें हा वधावा ॥ ६२ ॥

v. 'रिसां' पा० मे०. w. 'भुमीलागिं शोणीत तो पूर आला' पा० मे०. x. 'मार्गें' पा० मे०.

म्हणे त्यासि पाहा बरें रावणारी । उभा राहिला शीघ्र कोदंड[61]-धारी ॥
विरश्री बळें बाणिली दिव्य शोभा । रणामंडळीं ठाण मांडूनि ऊभा ॥ ६३ ॥
पुढें राघवें ओढिला बाण जैसा । वदे आदरें वीर सौमित्र तैसा ॥
पहावें घडी येक राजीव[62]-नेत्रें । वधीतों बळें दैत्य मुहूर्त[63]-मात्रें ॥ ६४ ॥
पुढें पावला तो अती चंड काया । [y]बहू बोलती येकमेकां छळाया ॥
तया येकमेकांस निर्वाण जालें । शरां सोडिलें व्योम संपूर्ण केलें ॥ ६५ ॥
शरा तोडिती एकमेकां विरांचे । पुन्हा मागुती भार येती शरांचें ॥
बळें भीडती बाणबाणास कैसे । पडों लागती छेदिले सर्प जैसे ॥ ६६ ॥
शरीं राक्षसें व्योम संपूर्ण केलें । विरें लक्ष्मणें शीघ्र छेदूनि नेलें ॥
रिपू कोपला मागुते बाण सोडी । बळें वीर सौमित्र तात्काळ तोडी ॥ ६७ ॥
पुढें वीर रामानुजें ते चि काळीं । नभीं मंडपू घातला बाणजाळीं ॥
किती चूकले भार येतां शरांचे । देहे खोंचले एकमेकां विरांचे ॥ ६८ ॥
विरश्री-बळें दुःख नाहीं तयांचें । नभीं पाहती देव कौतूक त्यांचें ॥
दळें थोकलीं युद्ध होतां खणाणां । तया मस्तकू डोलवी रामराणा ॥ ६९ ॥
भला रावणी[64] वीर हा चंडदेही । दुजा मानवी वीर सौमित्र तो ही ॥
महावीर दोघे रणामाजि कैसे । बळें मातले भीडती काळ जैसे ॥ ७०॥
पुढें शीघ्र सौमित्र तो वज्र-ठाणें । बळें तोडिलें शीर चंद्रार्ध-बाणें ॥
रणीं पाडिला तो अती चंडकाया । बळें लागले दैत्य मागें पळाया ॥ ७१ ॥
बहूसाल ते मृत्युपंथेंचि गेले । परी अल्प घायाळ मागें पळाले ॥
पुरी माजि जाऊन लंकापतीला । भयें सांगती सर्व संहार झाला ॥ ७२ ॥
बहू झुंजतां झुंजतां भग्न जाले । रणीं सर्व ही पुत्र-मंत्री निमाले ॥
नरां वानरांला जयो प्राप्त जाला । क्षयो राक्षसां शीघ्र टाकूनि आला ॥ ७३ ॥
पुढें रावणू तो भुमी अंग घाली । तया ऐकतां मूर्छना शीघ्र आली ॥
शरिरीं नसे शुद्धि सर्वै उडाली । बहू दैन्यवाणी दशा प्राप्त जाली ॥ ७४ ॥
करी रावणू शोक शंकारहीतू । सभा-मंडपीं धांवला इंद्रजीतू ॥
पिता शीघ्र आलिंगिला मेघनादें । म्हणे काय जी शीणतां व्यर्थ खेदें ॥ ७५ ॥
बहूतां परी जनकू[65] शीकवीला । म्हणे शीघ्र मारूनि येतों रिपूला ॥
तेणें रावणू शोक सांडूनि ठेला । बहूसाल सन्मानिलें त्या सुताला ॥ ७६ ॥
बहू दीस होती गळां रत्न माळा । तये पाहतां मोल थोडें भुगोळा ॥
करीं घेतली माळिका आवडीनें । सुताच्या गळां घातली ते[z] त्वरेनें ॥ ७७ ॥

---

६१. कोदंड=धनुष्य. ६२. राजीव=कमल. ६३. मुहूर्त=अत्यल्प काळ. y. ‘बळें’ पा० भे०. ६४. रावणी=रावणाचा पुत्र. ६५. जनक=बाप (रावण). z. ‘रावणानें’ पा० भे०.



अनुक्रमणिका

रणा चालिला वीर संग्राम सैरा । दळेंशीं बळें लोटला भार सैरा ॥
रथां घोडियां कुंजरां [६६]मीति नाहीं । बहूसाल वाद्यें पुढें एक घाई ॥ ७८ ॥
महा वैभवेशीं रणामाजि आला । तया इंद्रजीतें रणीं होम केला ॥
[a]यथायोग्य पूर्णाहुतीचेनि तोषें । रथू दीधला अग्निवर्णू [६७]हुताशें ॥ ७९ ॥
रथू तोमरू-खड्ग-बाणीं विराजे । वरी रावणी तो महा वीर साजे ॥
उडाला रथेंशीं बळें अंतराळें । असंभाव्य सोडी तळीं बाण-जाळें ॥ ८० ॥
बळें सूटले बाण त्या राक्षसाचे । बहू खोंचले भार [६८]गोळांगुळांचे ॥
[b]फुटों लागले कोथळे पादपाणी । भयें बोलती वानरें दैन्य वाणी ॥ ८१ ॥
कितीएक ते वीर भेणें पळाले । पुढें जात जातांचि चौरंग केले ॥
कितीएक मागें विरां आड जाती । अकस्मात तेथें चि ते भेदिजेती ॥ ८२ ॥
कपी-वाहिनीमाजि आकांत जाला । रणीं तो विरें वीर सर्वै निमाला ॥
सुमित्रा-सुतू बोलिला राघवाला । बहू आट जाला रिसां वानरांला ॥ ८३ ॥
पुढें बोलतां बोलतां ते चि काळीं । अकस्मात ते भेदिले बाण-जाळीं ॥
निचेष्टीत भूमी धनुष्यें गळालीं । विरें इंद्रजीतें [c] बहु ख्याति केली ॥ ८४ ॥
बळी रावणी एकला वीर जेठी । कपी पाडिले लक्ष कोट्यानुकोटी ॥
महा वीर ते धीर मेरू बळाचे । प्रतापें सुरांहूनि ते विक्रमाचे ॥ ८५ ॥
रिसां वानरां सर्व संहार केला । पुरी माजि तो येश घेऊनि गेला ॥
नमस्कार केला तया रावणाला । दळेंशीं बळें राम शत्रू निमाला ॥ ८६ ॥
रणीं सर्व ही पाडिले प्रेतराशी । बहूसाल आनंद त्या रावणासी ॥
महा सूख लंका-पुरीमाजि ऐसें । पुढें वर्तलें वानरांमाजि कैसें ॥ ८७ ॥
कपी रीस[d] ते पर्वता तुल्य कैसे । निमाले रणीं [e]पाडिले वृक्ष जैसे ॥
तयांमाजि कल्याण दोघां जणाला । कपी मारुती आणि बीभीषणाला ॥ ८८ ॥
रणें माजलें सर्व ही प्रेतरूपी । तया माजि ते दोघे [६९]उद्विग्न रूपी ॥
विचारूनियां [७०]वन्हि-शीखा उजेडें । रणा शोधिलें सर्व [f]तिहीं निवाडें ॥ ८९ ॥
रणा शोधितां सर्व सेनेसि अंत । तयामाजि तो बोलिला जांबुवंत ॥
पुढें वीर ते शीघ्र धांवूनि आले । तया पाहतां बाण आंगीं बुडाले ॥ ९० ॥
बहूसाल तो रीस घायाळ जाला । बळी[g] बाण-जाळीं रणीं आकळीला ॥
महावीर बीभिषणें ऊठवीला । बळें बाण वोढूनियां स्वस्थ केला ॥ ९१ ॥

---

६६. मिति=गणति. a. 'तयालागिं' पा० भे०. ६७. हुताश=विस्तव. ६८. गोलांगुल=वानर. b. 'तुटों' पा० भे०. c. 'रणीं' पा० भे०. d. 'वीर' पा० भे०. e. 'ठेविले' पा० भे०. ६९. उद्विग्न=दुःखी. ७०. वन्हिशिखा=विस्तवाची ज्वाला. f. 'ही तें' पा० भे०. g. 'बहू' पा० भे०.



अनुक्रमणिका

पुढें ऋक्ष बीभीषणालागीं पूसे । महावीर ते मुख्य आहेत कैसे ॥
म्हणे जांबुवंतासि नैऋत्य-[71]नाथू । विरा पुससी काय जाला अनर्थू ॥ ९२ ॥
महावीर दोघे निचेष्टीत झाले । [h]परी सुग्रिवादीक सर्वे निमाले ॥
रणामाजि तें शोधिली सर्व सेना । समस्तामध्यें एक तोही [i]दिसेना ॥ ९३ ॥
प्रसंगीं निरूपी यथातथ्य मातू । मनामाजि तो जांबुवंतू निवांतू ॥
म्हणे वीर बीभीषणू जांबुवंता । समस्तासि कल्याण तें सांग आतां ॥ ९४ ॥
म्हणे ऋक्ष तो मारुतीवीण कांहीं । विरां ऊठवाया दुजा प्रेत्न नाहीं ॥
क्षिराब्धी-तटीं योजनें चारि कोटी । गिरी द्रोण आणील हा वीर जेठी ॥ ९५ ॥
महा रम्य द्रोणाचळू भव्य रूपी । तया मस्तकीं औषधी दिव्यरूपी ॥
बळें आणितां ऊठती सर्व सेना । कपी मारुतीवीण दूजा दिसेना ॥ ९६ ॥
म्हणे जांबुवंतासि नैऋत्य-नाथू । असंभाव्य तूं सांगशी दूर पंथू ॥
गमे प्रेत्न हा सर्वथा ही घडेना । गिरी मारुतीचेनिही आणवेना ॥ ९७ ॥
म्हणे गा विरा काय तूं बोलिलाशी । कपी सारखा मारुता भावितोशी ॥
परी जाणहा ईश्वरू साक्ष रूपी । कळेना जना रुद्र पूर्ण-प्रतापी ॥ ९८ ॥
बहु स्तूति केली तया मारुताची । तयें तोषली वृत्ति बीभीषणाची ॥
म्हणे गा विरा संकटीं धांव घालीं । बळें ऊठवीं सर्व सेना निमाली ॥ ९९ ॥
कपी मारुती उत्तरें सिद्ध जाला । मनीं चिंतिलें राम-पादांबु[72]जाला ॥
महावीर आणील द्रोणाचळातें । पुढें वीनवी दास तो श्रोतयांतें ॥ १०० ॥

---

## प्रसंग ५वा प्रारंभ.

उभा राहिला वीर मंदार जैसा । मनाहूनि पूढें बळें वेग तैसा ॥
रूपें कर्कशू पाहतां पाहवेना । बहूसाल उंचाट त्या राहवेना ॥ १ ॥
अकस्मात तो व्योम[1]-पंथें उडाला । मही झोंकली पन्नगा[2] भार जाला ॥
बहू झोंकिले[a] कूर्म[3] वराह[4] दंती[5] । झडा चांचरे[b] ते धरा[6] सांवरीती ॥ २ ॥
स्फुरद्रूप सर्वांग वाजे झडाडां । उडाले नभीं वृक्ष वातें फडाडां ॥
असंभाव्य पिंजारिलें पुच्छ[7] मागें । नभोमंडळीं[8] जातसे लागवेगें ॥ ३ ॥
बहू लंघिली फोकळी वेग केला । द्विपें[9] पांच ही शीघ्र टाकूनि गेला ॥
उडाला बळें पांच सिंधू[10] अगाधू[11] । पुढें देखिला साहवा क्षीर-सिंधू[12] ॥ ४ ॥

---

७१. नैऋत्यनाथ=राक्षसांचा स्वामी. h. 'कपी' पा० भे०. i. 'वदेना' पा० भे०. ७२. पादांबुज=पदकमल. १. व्योम=आकाश. २. पन्नग=शेष, सर्प. a. 'थाकले' पा० भे०. ३. कूर्म=कासव. ४. वराह=डुकर. ५. दंती=हत्ती. b. 'चांचरीती' पा० भे०. ६. धरा=पृथ्वी. ७. पुच्छ=शेंपुट. ८. नभोमंडळ=आकाशमंडळ. ९. द्वीप=बेट. १०. सिंधु=समुद्र. ११. अगाध=खोल. १२. क्षीर=दूध.

तयाच्या तिरीं उंच आकाश पंथें । विरें देखिलें रम्य द्रोणाचळैतें[13] ॥
तया मस्तकीं दिव्य वल्ली अपारा । प्रभा फांकली तेज कल्लोळ सैरा ॥ ५ ॥
पुढें देखतां मारुता सांवरेना । धरीतां बळें तेज हाता चढेना ॥
महा औषधी दिव्य शैल्या निशैल्या । कपी देखतां सर्व ही गुप्त जाल्या ॥ ६ ॥
तया पर्वताची बहु स्तूति केली । परी नायके सर्व ही व्यर्थ गेली ॥
बहूसाल त्या [13]अचळें गर्व केला । पुढें मारुता कोप तात्काळ आला ॥ ७ ॥
महा थोर धिःकार केला तयासी । बळें शीघ्र उत्पाटिलें पर्वतासी ॥
गिरी घेतला पुच्छ वेष्टीत माथां । कपी-राज तो चालिला व्योम पंथा ॥ ८ ॥
रणीं जाहला सर्व संहार जेथें । महावीर आला अकस्मात तेथें ॥
नि[14]शा दाटली अंधकारें दिसेना । गिरी ठेवितां देखिली सर्व सेना ॥ ९ ॥
पिता पावला तो बळें मारुतीचा । रणीं वास नेला तया औषधींचा ॥
सुगंधें चि ते वीर आरोग्य जाले । कपी सर्व ही मृत्यु मारूनि ठेले ॥ १० ॥
दळेंशीं बळें ऊठला रामराजा । स्फुराणें रणीं[c] गर्जती वीर-फौजा ॥
पुढें मारुतें घेतलें पर्वताला । क्षिराब्धी तटीं शीघ्र ठेवूनि आला ॥ ११ ॥
तुलेना गती शक्ति माहा विराची । कळेना करी कोण संख्[15]या बळाची ॥
दिसे पाहतां वानरू वेषधारी । परी जाणिजे सत्य हा त्री[16]पुरारी ॥ १२ ॥
निशीच्या [17]पदें चारि कोटी उडाला । गिरी दों[d]पदीं शीघ्र घेऊनि आला ॥
पुन्हा मागुती तीपदां माजि नेला । प्रभातें चि चौथे पदीं प्राप्त जाला ॥ १३
सहस्रेक [18]गांवें गिरी[19] स्थूल मोठा । असंभाव्य या मारुतीचा चपेटा ॥
उडाला नभीं योजनें कोटि सोळा । नसे शोधितां दूसरा या भुगोळा ॥ १४ ॥
बहू पंथ चाले रवी भार नाना । बहू भार वाहे फ[20]णी तो उडेना ॥
गरूडासि तो आचळू हालवेना । दुजी साम्यता ब्रह्म-गोळीं दिसेना ॥ १५ ॥
पुढें मारुती भव्य आनंद-रूपी । नभोमंडळीं भा[21]नु जैसा प्र[22]तापी ॥
महा वीर तैसा दळामाजि आला । समस्तांसि देखोनि आनंद जाला ॥ १६ ॥
सखा तो जिवाचा असे दूरि देशीं । सदां लागलें चित्त हें त्याजपाशीं ॥
पुढें पाहतां तो अकस्मात आला । तया सारिखें [e]जाहलें मारुताला ॥ १७ ॥
कपीनें कसें पाहिलें राघवासी । पुढें देखिलें लोभियानें धनासी ॥
तथा बाळकें देखिलें जननी[23]ळीं । तया सारिखें जाहलें मारुताला ॥ १८ ॥

---

१३. अचळ=पर्वत. १४. निशा=रात्र. c. 'कपी' पा० भे०. १५. संख्या=गणना. १६. त्रिपुरारी=शिव. १७. पद=चवथा हिसा (प्रहर). d. 'द्रोण तो' पा० भे०. १८. गांव=योजन=चार कोस. १९. गिरी=पर्वत. २०. फणी=शेष. २१. भानु=सूर्य. २२. प्रतापी=ऊन पाडणारा, पक्षीं शूर. e. 'वाटलें राघवाला' पा० भे०. २३. जननी=आई.

नमस्कारिलें त्या रघूनायकासी । उभा राहिला हात जोडोनि पाशीं ॥
म्हणे राम धन्य गा धन्य वीरा । कपी काय द्यावें तुझ्या ऊपकारा ॥ १९ ॥
अगा मारुती तूझिया उपकारें । जिवा ऋण जालें बहूसाल भारें ॥
सदा सर्वदा आमुची थोर चिंता । समस्तांसि तूं एकला प्राण-दाता ॥ २० ॥
म्हणे मारुती सर्व स्वामी प्रतापें । प्रभू काय कीजेल म्यां दीनरूपें ॥
समर्था तुझेनी कृपेवीण कांहीं । स्वता अल्पहीं कार्य होणार नाहीं ॥ २१ ॥
बहूतां परी मारुतें स्तूति केली । मनोवृत्ति ते राघवाची निवाली ॥
पुढें राघवें रुद्र संतुष्ट केला । बहूतां परी आदरें गौरवीला ॥ २२ ॥
प्रसंगें कपी-नाथ[24] सुग्रीव बोले । म्हणे मारुती प्राण त्वां रक्षियेले ॥
कुळामाजि जालासि पूर्ण प्रतापी । कपीचीं कुळें सर्व ही श्लाघ्यरूपी[25] ॥ २३ ॥
कपी सर्व ही बाण-जाळें निमाले[26] । तुझीया प्रतापें पुन्हा जन्म जाले ॥
प्रसंगें सखा राघवें निर्मिलासी । कपी कारणें तूं बहू कष्टलासी ॥ २४ ॥
तया बोलतां मारुता सूख जालें । पुन्हा मारुतें ही बहू तोषवीलें ॥
असो हे बहूसाल पाल्हाळ-गोवी । कथा राहिली ते पुढें चालवावी ॥ २५ ॥
कपी-नाथ बोले रघूनायकासी । नये रावणू चंडदुःखें रणासी ॥
तरी शीघ्र लंकापुरी जाळवावी । समर्थें कपींलागिं आज्ञा करावी ॥ २६ ॥
पुढें बोलिजे सुग्रिवालागिं देवें । तुम्हीं कल्पिलें कार्य सिद्धीस न्यावें ॥
कपी राम-आज्ञेस घेऊनि वेगीं । विरांलागिं आज्ञा करी ते प्रसंगीं ॥ २७ ॥
तुम्हीं लागवेगें चुड्या पाजळीजे । बळें शीघ्र लंकापुरी दग्ध कीजे ॥
करीं घेतले उंच बांधूनि भारे । कपी धांवती एकमेकां पुढारे ॥ २८ ॥
चुड्या पावकें सर्व ही दीप्त केल्या । अकस्मात लंकापुरीमाजि नेल्या ॥
बळाचे कपी धांवती लक्ष कोटी । चुड्या खेळती थोर आनंद पोटीं ॥ २९ ॥
शिखी[27] लागतां शीघ्र जाले उमाळे । निळे पींवळे श्वेत[28] आरक्त[29] काळे ॥
बहू लागला चंड[30] वारा भरारां । पुरी माजि तो वन्हि[31] धांवे सरारां ॥ ३० ॥
गृहागोपुरा[32] जाहला एक वेळा । असंभाव्य हेलावती तीव्र ज्वाळा ॥
दिशा दाटल्या धूम्र आकाश-पंथें । पिडा जाहली खेचरां[33] भूचरांतें[34] ॥ ३१ ॥
मळें धूविलीं तीं तया रावणानें । सळें ऊसणें घेतलें पावकानें[35] ॥
बळें लागतां थोर कोपें कडाडी । बळें माजला वन्हि पोटीं धडाडी ॥ ३२ ॥

---

२४. कपी-नाथ=वानरांचानाईक. २५. श्लाघ्य=स्तुत्य. २६. निमाले=मेले. २७. शिखा=ज्वाला. २८. श्वेत=पांढरा. २९. आरक्त=लाल. ३०. चंड=सपाट्याचा. ३१. वन्हि=विस्तव. ३२. गोपुर=देवडी. ३३. खेचर=आकाशांत हिंडणारे. ३४. भूचर=पृथ्वीवर हिंडणारे. ३५. पावक=विस्तव.

बळें क्रोध आला तया पावकाला । वरी वात वेगीं बळें साह्य जाला ॥
शिखा[*] चालिल्या अंतराळीं धडाडां । जळों लागली दिव्य लंका भडाडा ॥ ३३ ॥
अपारें घरें गोपुरें रम्य सारें । बहूसाल धामें[36] दरें थोर थोरें ॥
पडों लागलीं दग्ध होतां धबाबां । महा राक्षसी तोंड घेती खबाबां ॥ ३४ ॥
ध्वनी राक्षसांची असंभाव्य जाली । मुखें बोलती आगि रे आगि आली ॥
कितीएक राक्षेस धांवूनि आले । अकस्मात ते वीर सर्वै [f]मिळाले ॥ ३५ ॥
बळें धांवली ते असंभाव्य सेना । पुढें जावया लाग कोठें दिसेना ॥
शिखा धांवती वन्हिच्या पाठि लागें । पळाले बळी प्राण घेऊनि वेगें ॥ ३६ ॥
बळें सूटलीं वैभवें राक्षसांचीं । बहू दाटलीं वाट प्रेतें विरांचीं ॥
कितीएक ते धीट नेटे जळाले । कितीएक ते वीर मागें पळाले ॥ ३७ ॥
त्रिकूटाचळीं थोर आकांत जाला । असंभाव्य राक्षेस कीती निमाला ॥
स्त्रिया बाळकें जेथ जेथें पळालीं । शिखा लागतां तेथ तेथें जळालीं ॥ ३८ ॥
पळायासि मार्गे पुढें रीघ नाहीं । जळाले पुरीमाजि ते सर्व कांहीं ॥
बहू कुंजरें[37] शाकटें[38] अश्व[39] नाना । निमाले रथी[40] सारथी[41] सर्व सेना ॥ ३९ ॥
सहस्रें दहा भुवनें[42] रावणाचीं । जळालीं बहू संपदा वैभवाची ॥
सुवरता अळंकार दिव्यांबरींचीं[43] । सुगंधेल आज्यादि[44] नाना रसांची[45] ॥ ४० ॥
गुरें वांसरें जाळिलीं पावकानें । बहू हाट[46] बाजार [47]केणी-दुकानें ॥
बहूतां जणांचें बहू वित्त गेलें । त्रिकूटाचळा पावकें शुद्ध केलें ॥ ४१ ॥
बहू वेवसायी[48] भले मोठ मोठे । भुसारी[49] जरी जोहरी आणि चाटे[50] ॥
जळाले बहू वित्त हाणोनि घेती । धरेना कदा सांवरेना रडंती[51] ॥ ४२ ॥
सभा-मंडपीं राक्षसीं हाक नेली । म्हणे पाहतां काय लंका जळाली ॥
दहा योजनें तीसरा भाग जो कां । बळें जाळिली वानरीं [g]सर्व लंका ॥ ४३ ॥
तया रावणा वाटली सर्व चिंता । म्हणे पाठवावें रणीं कोण आतां ॥
न दीसे मुखीं मंदली सर्व शोभा । पुढें बोलिला शीघ्र कुंभा निकुंभा ॥ ४४ ॥
म्हणे वानरीं जाळिली सर्व लंका । तयांशीं करा युद्ध टाकूनि शंका ॥
तया सांगतां सर्व ऊदीत जाले । महा वीर ते सात युद्धा निघाले ॥ ४५ ॥
बळी कुंभ नीकुंभ जंघ प्रजंघें । दळें सिद्ध केलीं बळें लागवेगें ॥

---

* शिखा=ज्वाला. ३६. धाम=घर. f. ' जळाले ' पा० भे०. ३७. कुंजर=हत्ती. ३८. शकट=गाडा. ३९. अश्व=घोडा. ४०. रथी=रथांत बसणारे. ४१. सारथी=रथ हाकणारे. ४२. भुवनें=घरें .४३. दिव्यांबरें=उंचीं वस्त्रें. ४४. आज्य=शेळीचें तूप ( अजा=शेळी ). ४५. रस=पातळ पदार्थ. ४६. हाट=बाजार. ४७. केणीं=जिन्नस. ४८. वेवसायी=उद्योगी, व्यापारी. ४९. भुसारी=धान्य विकणारे. ५०. चाटे=कापड विकणारे. ५१. रडंती=रडती. g. ' शीघ्र ' पा० भे०.

